बारी जहागिरदारवाडी पेनशेत पाणी पुरवठा योजना **ता.अकोले जि. अहमदनगर योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाब**त

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु २०१४/ प्र.क्र. १०६ /पा.पु.०९

मंत्रालय, मुंबई ४०००३२

तारीखः १२ /८/२०१४

वाचा:-

१) शासन पत्र क्रमांकः बैठक २०१३/ प्र.क्र.०९/ पा.पु.०६ दि. २८ जून,२०१३

२) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांचे पत्र क्र. मजीप्रा/सस/मनिसंवस कक्ष/गामीण/२३९ दि.२६/२/२०१४

प्रस्तावना:-

बारी जहागिरदारवाडी पेनशेत पाणी पुरवठा पुरवठा योजना, ता. अकोले जि. अहमदनगर या पाणी पुरवठा योजनेच्या रु.१९८.१५ लक्ष ढोबळ खर्चाच्या अंदाजपत्रकास ग्रामपंचायत, बारी,ता अकोले,जि.अहमदनगर यांनी दि.२/१०/२००६ च्या ठरावा अन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान केली होती. तथापि, काही अपरिहार्य कारणांमुळे योजनेच्या खर्चात रु. २१२.३८ लाखाने वाढ झाली आहे. सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यासाठी स्थापन करण्यात आलेल्या राज्य स्तरावरील छोटया गटाच्या दि.२/५/२०१३ रोजीच्या बैठकीत शिफारस केल्यानुसार, बारी जहागिरदारवाडी पेनशेत पाणी पुरवठा योजना ता. अकोले जि. अहमदनगर या पाणी पुरवठा योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय:-

वरील बाब विचारात घेऊन बारी जहागिरदारवाडी पेनशेत पाणी पुरवठा पुरवठा योजनेच्या रु.४१०.५३ लाख किंमतीच्या सुधारित योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत नियोजन व वित्त विभागास प्रस्ताविण्यात आले होते. तथापि, नियोजन विभागाने कॉस्ट इन्फलेक्शन इंडेक्स नुसार रु. २९९.७० लक्ष इतक्या किंमतीस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान केलेली आहे. त्यानुसार बारी जहागिरदारवाडी पेनशेत पाणी पुरवठा योजनेच्या रु. १०१.५५ लाख या वाढीव खर्चासह रु. २९९.७० लाख (रुपये दोन कोटी नव्याण्णव लाख सत्तर हजार फक्त) इतक्या सुधारित किमतीस प्रशासकीय मंजुरी प्रदान करण्यात येत आहे.

१. ही योजना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत कार्यान्वित करण्यात येईल.
२. या योजनेच्या मूळ प्रशासकीय मंजुरी दिलेल्या निर्णयात ज्या सूचना दिलेल्या आहेत, त्याचे काटेकोरपणे पालन करावे. तसेच मूळ शासन निर्णयात ज्या अटी व शर्ती दिल्या आहेत त्या कायम राहणार असून त्याचेही पालन करण्यांत यावे.
३. सदर योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधीत ग्रामपंचायत/ जिल्हा परिषदेच्या ताब्यात देण्यात

यावी. संबंधीत कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी व ग्रामीण योजना विभाग यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यासंबंधी संबंधीत ग्रामपंचायत / जिल्हापरिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हापरिषद व संबधित ग्रामपंचायतीच्या अधिका-यांनी संयुक्तपणे पहाणी आयोजित करावी आणि अशा पहाणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

४. सदर योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) यावर दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी किंवा घसारा किंवा यंत्रसामुग्री नवी करण्याच्या निधीसाठी किंवा योजनांच्या खर्चातील लाभ घेण्याचा हिस्सा सोसण्यासाठी येईल त्या खर्चाच्या व्यवस्थेसाठी जिल्हा परिषदेस किंवा ग्रामपंचायतीस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही. महाराष्ट्र ग्रामपंचायत कर व फी नियम, १९६० मधील तरतुदींनुसार आकारण्यात येणा-या पाणीपट्टीच्या आधारे योजना स्वावलंबी ठरेल हे पाहण्याची जबाबदारी संबंधित ग्रामपंचायतीची / जिल्हा परिषदेची राहील. त्या अनुषंगाने या योजनेकरीता आवश्यक पाणीपट्टी ग्रामपंचायत आकारेल. ग्रामपंचायतीने तशा आशयाचा ठराव केल्याशिवाय योजनेची उर्वरीत कामे हाती घेवू नयेत.

५. सदर योजनेची उर्वरीत कामे सहा महिन्याच्या कालावधीत पूर्ण करण्यात यावीत.योजना पुर्नसुधारित करण्यात येणार नाही.

६. या योजनेवर होणारा खर्च आदिवासी उप योजनेअंतर्गत उपलब्ध करण्यात आलेल्या अनुदानामधून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभागाच्या अनुक्रमे अनौपचारिक संदर्भ क्र. १९४/का १४४३ दि. ८/७/२०१४ व ३९७/व्यय-३ दि.४/८/२०१४ अन्वये प्राप्त त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८१२१११२५८६०२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

FULSUNDER VAISHALI D

Digitally signed by FULSUNDER VAISHALI D
DN: c=IN, o=Govt Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation, postalCode=400001, st=Maharashtra, cn=FULSUNDER VAISHALI D
Date: 2014.08.12 11:09:57 +05'30'

**वै. द. फुलसुंदर**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. विभागीय आयुक्त, नाशिक.

२. जिल्हाधिकारी, अहमदनगर
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर
४. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
५. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी व ग्रामीण योजना, ठाणे
६. वित्तीय सल्लागार व मुख्या लेखाधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नवी मुंबई.
७. महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १/ मुंबई .
८. अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (संकल्पचित्र व नियोजन विभाग,) नवी मुंबई.
९. अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी व ग्रामीण योजना मंडळ, अहमदनगर
१०.कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी व ग्रामीण योजना विभाग, संगमनेर
११.कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, अहमदनगर
१२.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई./निवासी लेखा व परिक्षा अधिकारी, मुंबई.
१३.सर्व विधानमंडळ सदस्य.
१४.वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५.प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१६.मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, यांचे स्वीय सहाय्यक पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,
१७.कार्यासन क्रमांक पापु-०४,०६,१०,१३,१७,१८, २० व संगणक कक्ष, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,
१८. निवडनस्ती कार्यासन पापु-०९